सन २०२४-२५ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो-२०२४/प्र.क्र.१५२/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०००३२.
दिनांक : १८ जुलै, २०२४.

**संदर्भ -:**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या संकेत स्थळावरील राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४
३. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. ७-१/२०२४-RKVY, दिनांक १४.५.२०२४
४. कृषि विभाग शासन पत्र क्रमांक CSS २०२४/C.R.१२/२-A दिनांक १३.०५.२०२४
५. कृषि विभाग शासन निर्णय क्रमांक कृयांयो-२०२४/प्र.क्र.१२८/८-अे, दि. २८.०५.२०२४.
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२४ आरकेव्हीवाय/१, दि. ०३.०६.२०२४
७. संचालक (नि. व गुनि.), कृषि आयुक्तालय यांचे पत्र क्र. कृ.यां.उ.अ./गुनि-५/नक्र.२१२/२०२४-२५/१५८०५/ २०२४, दि. १४.०६.२०२४
८. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक बीयुडी २०२४/प्र.क्र. ७/कार्यासन-६ दि. १२.०७.२०२४

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्रांची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १०० टक्के आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधी हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान समाविष्ट केल्यामुळे RKVY च्या मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील SLSC च्या दिनांक ०३.०५.२०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिल्याप्रमाणे केंद्र हिस्सा रु.१४३७५.०० लाख व त्यासाठीचा पूरक राज्य हिस्सा रु.९५८३.३३ लाख याप्रमाणे एकूण रु.२३९५८.३३ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखडयास सं.क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ ५ अन्वये कृषि यांत्रिकीकरण अभियानासाठी सन २०२४-२५ करिता अनुसूचित जमातीसाठी वितरीत केलेला केंद्र हिस्सा रु. २६९.०० लाख त्यास समरुप राज्य

हिस्सा रु.१७९.३३३३३ लाख निधी असे एकूण रु. ४४८.३३३३३ लाख इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२४-२५ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. २६९.०० लाख (रुपये दोन कोटी एकोणसत्तर लाख फक्त) त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१७९.३३३३३ लाख (रुपये एक कोटी एकोणऐंशी लाख तेहत्तीस हजार तीनशे तेहत्तीस फक्त) असे एकूण रु.४४८.३३३३३ लाख (रुपये चार कोटी अठ्ठेचाळीस लाख तेहत्तीस हजार तीनशे तेहत्तीस फक्त) इतका निधी आयुक्त, कृषि यांना वितरित करण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमाक : टी-५<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती उप योजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उप योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना,<br>(०१) (११) कृषी उन्न्ती योजना कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ए ४५९),<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमाक : टी-५<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती उप योजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उप योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना,<br>(०१) (१०) कृषी उन्न्ती योजना कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ए ४४१),<br>३३ अर्थसहाय्य |

३. या उप-अभियानाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने वार्षिक कृति आराखड्यात मंजूर केलेल्या बाबींवर खर्ची टाकावा तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांना महा-डीबीटी प्रणालीद्वारे आधारसंलग्न बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

४. उपलब्ध निधी अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लाख यापैकी जे कमी

असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लाख यापैकी जे कमी असेल ते याप्रमाणे अनुदान देण्यात यावे.

६. इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, व संदर्भ क्र. ५ व संदर्भ क्र. ८ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ५ तारखे पर्यंत केंद्र शासनास सादर करावा.

७. सदर अभियानाकरिता वितरित केलेला निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून आणि सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित १ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच आदिवासी विकास विभागाच्य संदर्भ क्र. ८ येथील दिनांक १२.०७.२०२४ रोजीच्य शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१८१२४११४७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.07.18 12:53:29 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति-:**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२.
२. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
३. अ.मु.स. (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
४. अ.मु.स.(आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
७. विभागीय कृषि सह संचालक (सर्व).

८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता).
१०.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११.आदिवासी विकास विभाग (का-९) मंत्रालय, मुंबई-३२.
१२.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई- ३२.
१३.निवड नस्ती (कार्यासन -८ अे).